विशेष तपास पथक (SIT) स्थापन करणेबाबत.
बी.टी. कापूस बियाणांमध्ये परवानगी नसलेले तणनाशकाला सहनशील असणारे जीन (Herbicide Tolerant Transgenic Gene) आढळून आल्याप्रकरणी चौकशी करणेकरीता.

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय पुरकपत्र क्रमांक: बियाणे १०१७/प्र.क्र.१९४(भाग-१)/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० जुन, २०१८.

वाचा:-

१) केंद्र शासनाचे दिनांक १०/०१/२०१८ रोजीचे गोपनीय अ.शा.पत्र क्रमांक ९८/AM.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक:- एनओसी २०११/प्र.क्र.३७८/१अे, दिनांक १७.११.२०१२.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक:- बियाणे १०१७/प्र.क्र.१९४/१अे, दिनांक ०७/०२/२०१८.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक:- बियाणे १०१७/प्र.क्र.१९४/१अे, दिनांक ०३/०३/२०१८.
५) श्री. कृष्ण प्रकाश (भा.पो.से.), अध्यक्ष, विशेष तपास पथक (SIT) यांचे दिनांक ०४ एप्रिल, २०१८ रोजीचे पत्र क्रमांक वि.त.प./SIT/२३.

**प्रस्तावना:-**

बी.टी. कापसाच्या बियाणांमध्ये परवानगी नसलेले तणनाशकाला सहनशील असणारे Transgenic Herbicide/Glyphosate Tolerant Trait वापरून अनेक बियाणे उत्पादक कंपन्यांनी अवैधपणे बियाणांचे उत्पादन व विक्री केल्याची बाब निदर्शनास आलेली असल्याने याबाबत दिनांक ०३ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये **श्री. कृष्णप्रकाश (भा.पो.से.), विशेष पोलीस महानिरीक्षक, (व्ही.आय.पी. सुरक्षा), मुंबई** यांच्या अध्यक्षतेखाली विशेष तपास पथक (Special Investigation Team) स्थापन करण्यात आलेले आहे. यासंदर्भातच्या कार्यकक्षा, अटी आणि शर्थी दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमुद केल्यानुसार आहेत.

सदर अटी व शर्थीनुसार सदर पथकास अहवाल सादर करण्यास एक महिन्याचा कालावधी निश्चित करण्यात आलेला होता. तथापि, सदर प्रकरणाच्या कामकाजाची व्याप्ती मोठी असल्यामुळे त्यानुषंगाने माहिती संकलित करण्यासाठी विशेष तपास पथकास राज्यातील व बाह्य राज्यातील वरिष्ठ अधिकारी, कार्यालये, संबंधित बियाणे कंपन्या यांना भेटी देणे आवश्यक आहे. त्यामुळे विशेष तपास पथकास अहवाल सादर करण्यासाठी कालावधी वाढवून देण्याबाबत श्री. कृष्ण प्रकाश (भा.पो.से.), अध्यक्ष, विशेष तपास पथक (SIT) यांनी संदर्भ क्रमांक ५ येथील पत्रान्वये विनंती केलेली आहे. यासंदर्भात सदर प्रकरणाची व्याप्ती पाहता सदर विशेष तपास पथकास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

बी.टी. कापसाच्या बियाणांमध्ये परवानगी नसलेले तणनाशकाला सहनशील असणारे Transgenic Herbicide/Glyphosate Tolerant Trait वापरून अनेक बियाणे उत्पादक कंपन्यांनी अवैधपणे बियाणांचे उत्पादन व विक्री केल्याची बाब निदर्शनास आलेली असल्याने याबाबत दिनांक ०३ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये **<u>श्री. कृष्णप्रकाश (भा.पो.से.), विशेष पोलीस महानिरीक्षक, (व्ही.आय.पी. सुरक्षा), मुंबई</u>** यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या विशेष तपास पथकास (SIT) त्यांचा अहवाल सादर करण्यासाठी दिनांक ०३ एप्रिल, २०१८ पासून दिनांक ०२ सप्टेंबर, २०१८ पर्यंत म्हणजे पाच महिन्यांचा कालावधी वाढवून देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१८०७०३१२०४२०४५०१ असा आहे. हे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2018.07.03 12:05:01 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. आयुक्त, राज्य गुप्त वार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, (व्ही.आय.पी. सुरक्षा), मुंबई.
१०.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.कृषि संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.विभागीय कृषि सह संचालक, अमरावती.
१३.विभागीय कृषि सह संचालक, सर्व.
१४.मुख्य गुणवत्ता नियंत्रण अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.निवडनस्ती, कार्यासन १अे.